**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) सेंद्रिय शेती) सन २०१९-२० करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पुरक १५१९/ प्र.क्र. १३५/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२

दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२०

वाचा : १) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना.

२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशेयो /१२१४प्र.क्र.२६६/१७, दि.२०.०२.२०१६.

३) केंद्र शासनाचे पत्र क्र.९-३९/२०१५/Org.Fmg, दि.०२ जुन, २०१७.

४) केंद्र शासनाचे क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(i), दि. २५ ऑक्टोबर, २०१९

५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. पकृवियो/नि.उ./प्रक्र ३/ ५४६/२०१९, दि. ०५/११/२०१९

६) शासन निर्णय क्रमांक : योजना ३३१९/ प्र.क्र. १३९/१-अे , दि. ०३/१२/२०१९

**प्रस्तावना -:**

राज्य शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना ( सेंद्रिय शेती) ही योजना २०१५-१६ पासून केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्याचा निर्णय संदर्भाधिन क्रमांक ०२ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. यामध्ये सध्या ९३२ गटांचा तीन वर्षाचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे. याशिवाय नवी दिल्ली येथे दिनांक ११ मे, २०१७ रोजी परंपरागत कृषी विकास योजनेची तिसरी कार्यकारी समितीची बैठकीमध्ये केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याकरिता नवीन ३२६ गट मंजूर केलेले आहेत. त्यानुषंगाने राज्य शासनाने अनु.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये ३२६ गटांचा व्दितीय वर्षाचा कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना राबविण्याकरिता ३२६ गटांकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. १४५०.९७ लाख इतक्या निधीस केंद्र शासनाचे संदर्भ क्र. ४ अन्वये मान्यता दिलेली आहे. केंद्र हिश्श्यास अनुसरुन राज्य हिस्सा रु. ९६७.३१ लाख असे एकूण रु. २४१८.२८ लाख होत आहे.

सन २०१९-२० मध्ये केंद्र हिश्श्याकरिता लेखाशिर्ष २४०१ ए०५६ अंतर्गत रु. १०००.०० लाख तसेच, राज्य हिश्श्याकरिता लेखाशिर्ष २४०१ ए०६५ अंतर्गत रु. ६६६.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध असल्याने सदर तरतूदीच्या अधीन राहून केंद्र हिश्श्याकरिता रु. १०००.०० लाख व राज्य हिश्श्याकरिता रू. ६६६.०० लाख असा एकूण रु. १६६६.०० लाख इतका निधी अनु.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

आता, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना राबविण्याकरिता ३२६ गटांकरिता व्दितीय वर्षाचा कार्यक्रम राबविण्यासाठी विधीमंडळाच्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरक मागणीव्दारे मंजूर झालेल्या निधीतून केंद्र हिश्श्याकरिता लेखाशिर्ष २४०१ ए०५६ अंतर्गत रु. ४५०.९६९९२ लाख तसेच, राज्य हिश्श्याकरिता लेखाशिर्ष २४०१ ए०६५ अंतर्गत रु. ३०१.३१३२८ लाख असा एकूण रु. ७५२.२८३२० लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना (सेंद्रिय शेती), सन २०१९-२० मध्ये राबविण्याकरिता ३२६ गटांकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याकरिता रू. ४५०.९६९९२ लाख व राज्य हिश्श्याकरिता रु. ३०१.३१३२८ लाख असा एकूण रु. ७५२.२८३२० लाख इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीतून ३२६ गटातील व्दितीय वर्षातील घटक राबवावयाचे आहेत.

२. सदर निधी अनु.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(३५)(००)कृषि उन्नती योजना – परंपरागत कृषी विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>केंद्र हिस्सा- ६०%<br>२४०१ ए ०५६ कार्यक्रम<br>३३अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(३६)(००) कृषि उन्नती योजना -परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>राज्य हिस्सा -४० %<br>२४०१ ए ०६५ कार्यक्रम<br>अर्थसहाय्य ३३ |

**३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक २२ जानेवारी, २०२० मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५१५१४२१५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe,
serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.02.15 15:16:08 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. सचिव (कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
६) कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा).
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१३) नियोजन विभाग-१४३१, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवडनस्ती, कार्यासन १-अे